**निरादेवघर व गुंजवणी धरणाचे कालवे कार्यन्वित होईपर्यंत विनावापर राहणारे पाणी समन्यायी तत्वावर तात्पुरत्या स्वरुपात नीरा डावा कालवा व निरा उजवा कालव्यावर क्षेत्रीय वाटपाअंतर्गत (Sectoral Allocation) सिंचन प्रवर्गासाठी वापरण्यास मंजुरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१३/प्र.क्र.६३५ /सिंव्य (धोरण)**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २४/०२/२०२०.

संदर्भ:-
1) शासन पत्र क्र. कृखोवि-२००६/(८५१/२००६)/सिंव्य (धोरण), दिनांक०४.०४.२००७.
2) शासन पत्र क्र. संकीर्ण-२०१३/(६३५/१३)/सिंव्य(धोरण), दिनांक २/०५/२०१४, दि.६.६.२०१९,दि.१२.०६.२०१९ व दि. १७.१२.२०१९.
3) शासन पत्र क्र.संकीर्ण-२०१३/(६३५/१३) /सिं.व्य.(धो) दि.०६.०९.२०१९ व दि.१७.१२.२०१९.
4) मुख्य अभियंता(जसं), जलसंपदा विभाग, पुणे यांचे पत्र जा. क्र. मुअ (जसं)/ (१०४/२०१३)/ प्रशा-८/१९०, दि.०७/०१/२०२०

१.० प्रस्तावना:

१. नीराखोऱ्यात१३० वर्षापूर्वी पासून सिंचनास सुरूवात झालेली आहे. सन १८८९ मध्ये नीरा नदीची उपनदी येळवंडी नदीवर भाटघर येथे एस आकाराचे (Lake Whiting) धरण बांधण्यात आले व खालील बाजूस २७ कि.मी. अंतरावर वीर येथे पिकअप विअर बांधण्यात आला. त्या पिकअप विअर वरुन नीरा डावा कालवा हा पुणे जिल्ह्यातील नीरा नदीच्या डाव्या तीरावरील सिंचनासाठी बांधण्यात आला. पहिल्या टप्प्यात नीरा डावा कालव्याची वहनक्षमता १२.८८ क्युमेक्स(४५५ क्युसेक्स) इतकी संकल्पीत करुन त्याचा फायदा नीरा डाव्या कालव्यावरील ६०६५६ हे.सिंचन क्षेत्रास व ६८७६७ लागवडी योग्य क्षेत्रास नियोजित होता.

- सन १९१२ ते १९२६ या काळात दुसऱ्या टप्प्यात भाटघर येथे मोठे धरण (Llyod dam) २३.४०२ टीएमसी क्षमतेचे बांधण्यात आले ,याच काळात वीर पिकअप विअर वरुन नीरा उजवा कालव्याचे बांधकाम करण्यात आले व त्यावेळी नीरा डावा कालव्याचे वहन क्षमता वाढवून २०.३९ क्युमेक्स (७२० क्युसेक्स) करण्यात आली. वीर पिकअप विअर पासून निरा उजवा कालवा (लांबी १६९ कि.मी.) व निरा डावा कालवा (लांबी १६१ कि.मी.) असे दोन कालवे निघतात.
- निरा उजव्या कालव्याचे काम सन १९१७ ते १९३५ या कालावधीमध्ये पूर्ण झाले आहे. तदनंतर सन १९५४ ते १९६२ या काळात वीर येथे साठवण धरण बांधून व अस्तित्वातील नीरा उजवा कालव्याची वहन क्षमता ३१.१५ क्युमेक्स (११०० क्युसेक्स) ने वाढवून ३५१२० हे. क्षेत्राचे सिंचन करण्याचे योजिले होते. तदनंतर नीरा उजवा कालव्यावरील अधिकचे ४०३२० हे. लाभक्षेत्राकरिता कालव्याची

वहनक्षमता वाढवून ४२.४८ क्युमेक्स (१५०० क्युसेक्स) करण्यात आली. निरा उजव्या कालव्याची सध्याची वहन क्षमता १५०० क्युसेक्स इतकी असून, लागवडीयोग्य क्षेत्र १८१२६६ हे. व सिंचन क्षमता ६५६०६ हे. इतकी आहे.

२. सन१९६५ ते १९८८ या २४ वर्षांच्या कालावधीमधील वीर धरण सांडव्यावरुन वाहिलेल्या अतिरिक्त पाण्याचा अभ्यास करण्यात आला. या अभ्यासानुसार वीर धरणाच्या ठिकाणी ७५ टक्के विश्वासार्हतेचा येवा ३६५ दलघमी इतका येत होता. निरा प्रकल्पातील २३९ दलघमी च्या नियोजित वापरानंतर सुध्दा १२३ दलघमी येवा उपलब्ध राहत होता. या अतिरिक्त राहणाऱ्या १२३ दलघमी पाण्यापैकी निरा डावा कालव्यास ५१ दलघमी पाणी (९०% विश्वासार्हतेचे) खरीप हंगामामध्ये वापरुन निरा डावा कालव्यावरील उभ्या पिकाची सिंचनाची गरज भागविणे व शेटफळ तलाव भरण्याच्या अनुषंगाने निरा डावा कालव्याची वहन क्षमता वाढविण्यासाठी निरा डावा कालव्याचे नुतनीकरण (Modernization) प्रस्तावास शासनाने सन १९८९ मध्ये प्रशासकीय मान्यता दिली. यामध्ये निरा डावा कालव्याचे नुतनीकरण करुन त्याची वहन क्षमता ७२० क्युसेक्स वरुन वाढवुन ९४५ क्युसेक्स (म्हणजेच २६.७६ क्युमेक्स) करण्यास शासनाने मान्यता दिली होती.

३. निरा डाव्या कालव्याचे लाभक्षेत्र बारामती ,पुरंदर तसेच इंदापुर तालुक्यातील येते.निरा डाव्या कालव्यावर एकुण ५९ वितरीका असुन वितरीका क्र.४६ पर्यंतचे क्षेत्र बारमाही आहे व त्यापुढील इंदापुर क्षेत्र बिगर बारमाही आहे .निरा उजवा कालव्याचे लाभक्षेत्र सातारा जिल्ह्यातील खंडाळा व फलटण तसेच सोलापूर जिल्ह्यातील माळशिरस, पंढरपूर व सांगोला या तालुक्यात येते. निरा उजव्या कालव्यावरील कि.मी १५० ( मैल ९३ ) वरील शाखा क्र.२ पर्यंतचा भाग बारमाही आहे व त्यापुढील पंढरपुर व सांगोला तालुक्यातील कि.मी.१६९ पर्यतचे क्षेत्र बिगर बारमाही आहे .

४. नीरा देवघर धरणाचे काम सन -२००७ मध्येपुर्ण झाले असुन ११.७३ टीएमसी उपयुक्त पाणीसाठा निर्माण झालेला आहे व गुंजवणी धरणात सन २००७ पर्यंत ०.७० टीएमसी पाणीसाठा निर्मीत झालेला होता. या दोन्ही प्रकल्पांच्या कालव्याची कामे अपूर्ण असल्याने त्यांच्या नियोजीत लाभक्षेत्रात पूर्ण पाणी वापर होऊ शकत नाही ,ही बाब विचारात घेऊन या शिल्लक राहणाऱ्या पाण्याचा वापर होण्याच्या दृष्टीने या दोन्ही धरणात उपलब्ध होणाऱ्या पाणीसाठयापैकी ६० टक्के पाणी नीरा डावा कालव्यासाठी व ४० टक्के पाणी नीरा उजवा कालव्यासाठी शासन पत्रदि.४.४.२००७ अन्वयेदि. ४/०४/२००७ ते ३/०४/२०१२ या कालावधीकरीता मंजुरी दिलेली होती. तदनंतर दिलेली मंजुरी पुढील ५ वर्षा करिता म्हणजेच दि.४/०४/२०१२ ते ३/०४/२०१७ पर्यंत मुदतवाढ देणेत आलेली होती. सदर मुदत संपुष्टात आल्यावर सन २०१९ पर्यंत कालवा सल्लागार समितीत उपरोक्त ६० : ४० या प्रमाणात निराडावा व उजव्या कालव्यासाठी पाणी वाटप होत होते.

५. मुदत संपुष्टात आल्याने महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचेकडुन नीरा देवघर व गुंजवणी धरणाच्या पाणी वाटपास मुदतवाढ मिळणेसाठी प्रस्ताव महामंडळस्तरावरुनशासनास सादर करण्यात आलेला होता. याबाबत शासन जलसंपदा विभागाचे पत्र जा.क्र. संकीर्ण-२०१३ / (६३५/१३)/ सिं.व्य.(धो) दि.१२.०६.२०१९ अन्वये निरा देवघर धरणातील विनावापर राहणारे पाणी निरा देवघर धरणाच्या अधिसूचित लाभक्षेत्रामध्ये निरा उजवा कालव्याद्वारे उपसा सिंचन योजनेमार्फत सिंचनासाठी व पिण्यासाठी निरा देवघर प्रकल्पाच्या कालव्याची व वितरण प्रणालीची

कामे पूर्ण होऊन त्याचा नियोजित लाभक्षेत्रात संपूर्ण पाणी वापर सुरूवात होईपर्यंत या पर्यायी व्यवस्थेस मान्यता देण्यात आली आहे. तथापि यात गुंजवणीधरणाच्या पाणी वाटपाचे निर्देश दिलेले नाहीत.

६. कालव्याच्या सुरवातीला कालवा हद्दीमध्ये कालव्यावरील उपसा परवाने दिले आहेत. उपसा सिंचन योजनांस विसर्ग वापरला गेल्याने प्रवाही सिंचनासाठी कालव्याचा विसर्ग कमी पडत आहे व सिचंनामध्ये विस्कळीत पणा / अडचणी येत आहेत यासाठी आवर्तन कालावधीमध्ये मंजूर उपसा योजनांचा अतिरिक्त पाणी वापर नियंत्रित करण्यासाठी व पुच्छ भागातील सिचंनासाठी अपेक्षित विसर्ग उपलब्ध करण्यासाठी उपसा बंदी करावी लागत आहे. सद्य:स्थितीत मुख्य कालव्यावर उपसा बंदी लागू केल्याशिवाय पुच्छ भागात आवश्यक विसर्ग मिळत नाही. यापुढे नीरा उलवा कालव्यावरुन निरा देवघर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रामध्ये उपसा सिंचन योजनांस नवीन मंजूरी दिल्यास निरा उजवा कालव्याच्या पुच्छ भागातील सिंचनासाठी विसर्ग उपलब्ध करुन देणे जिकरीचे होणार आहे व त्यामुळे मोठया प्रमाणावर अडचणी निर्माण होण्याची शक्यता आहे.

७. त्यानुषंगाने नीरा उजवा कालव्यावरुन निरा देवघर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रामध्ये सिंचनासाठी मंजूरी दिलेल्या क्षेत्राचा तपशील व नीरा उजवा कालव्यावरील प्रवाही व ठिबक उपसा सिंचनासाठी अनुज्ञेय क्षेत्र, खर्ची पडलेले क्षेत्र व शिल्लक क्षेत्र यांचा एकत्रित विचार करता, निरा डावा व उजव्या कालव्याच्या लाभक्षेत्रास निरा देवघर व गुंजवणी प्रकल्पातील विनावापर राहणारे पाणी तात्पुरत्या स्वरूपात समन्यायी तत्वावर वाटप करण्याची बाबत शासनाच्या विचाराधीन होती.

८. सदर वाटप असे करावे लागेल कि नीरा उपखोऱ्यातील चारही (४) धरणातील उपलब्ध पाणी दोन्ही कालव्यांच्या लाभक्षेत्रात (ICA) प्रति हेक्टरी अथवा प्रती स.घ.मी. भिजणारे क्षेत्र समान होईल. तथापि असे करतांना मूळ प्रकल्पांच्या मंजूर प्रकल्प अहवालानुसार त्यांना उपलब्ध झालेले पाणी तसेच राहील व फक्त अपूर्ण प्रकल्पांच्या विनावापर पाण्याचेच फक्त फेर वाटप होईल. दोन्ही कालव्याच्या लाभक्षेत्रास (ICA) प्रति हेक्टरी समान वाटप केल्यास ते वाटप दोन्ही प्रकल्पाच्या लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांना समन्यायी होईल, याबाबत म.ज.नि.प्रा.अधिनियम २००५, सन २०११ चा सुधारणा अधिनियम क्र.२१, दि.२२ एप्रिल, २०११ मधील तरतुदीनुसार चा मंत्रीमंडळ समिती बैठक, दि.१९/०२/२०२० मध्ये मान्यता देण्यात आली

## <u>शासन निर्णय :-</u>

१) नीरा देवघर व गुंजवणी धरणाचे कालवे वितरण प्रणाली अपूर्ण असल्याने विनावापर शिल्लक राहणारे पाण्याचे वाटप नीरा उजवा कालवा व नीरा डावा कालव्याचे लाभक्षेत्रास महाराष्ट्र जलसंपत्ती अधिनियमन २००५ मधील तरतूदी नुसार समन्यायी तत्वावर करावे.

२) नीरा देवघर व गुंजवणी धरणात त्या त्या वर्षी उपलब्ध होणारे पाणी, त्या प्रकल्पांचे प्रकल्पीय पाणी नियोजन व गरज विचारात घेवून शिल्लक राहणारे विनावापर पाणी नीरा डावा कालवा (५५ %)व नीरा उजवा कालवा (४५%)या प्रमाणात क्षेत्रीय वाटपाअंतर्गत (Sectoral Allocation)सिंचन प्रवर्गासाठी वापरण्यात यावे.

३) विनावापर राहणाऱ्या पाण्याचे समन्यायी वाटपाचे हे तत्व निरा देवघर व गुंजवणी प्रकल्पाचे कालवे वितरण प्रणालीतून सिंचनाचा वापर पूर्ण होईपर्यतच्या कालावधीसाठी लागू राहील.

४) सदर निर्णयाचे पुनर्विलोकन महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम २००५ यात सुधारणा करण्याकरिता अधिनियम (सन २०११ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२१) मधील कलम १६ (क) (१) मधील तरतूदीनुसार करण्यात येईल.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असूनत्याचा संगणक संकेतांक २०२००२२४१७२८२०१८२७ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे मा.राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Pawar

Digitally signed by Rajendra Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=342136a5a7ee0fcd0112d8ebe8775490c604dc2efe60f5f49ea96ca189faa2de, serialNumber=3fb57c876a83ad32f467381adaa70337a2a433b773eff3a425fd0ec477e0d9cf, cn=Rajendra Pawar
Date: 2020.02.24 17:31:14 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**सचिव (लाक्षेवि)**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव .
९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१० प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१३. मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मुख्य अभियंता , (जसं) जलसंपदा विभाग,पुणे.
१५. अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे.
१६. निवडनस्ती कार्यासन सिंव्य (धोरण)

********